एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत जिल्हा कक्षातील ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. मबाआ-२०२०/प्र.क्र.१६/का-७अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १७ मार्च, २०२०

संदर्भ:- १) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७ दि. ५.४.२००३
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वि.सु.-१, दि.४.१०.२००४
३) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग,क्र.मबाआ-२००३/प्र.क्र.४३८/का-६,दि.१४.१.२००४
४) केंद्र शासनाचे पत्र क्र.एफ-१४-०९/२००५-सीडी-१,दि.८.५.२००९ व दि.९.३.२०१०
५) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग,क्र.मबावि-२०१०/प्र.क्र.२४२(भाग१) /का७, दि.५.९.२०१४
६) शासन निर्णय,महिला व बाल विकास विभाग,क्र.मबावि-२०१४/प्र.क्र.१५१/का-७, दि.३०.११.२०१५
७) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ- २०१८/प्र.क्र.७/का-७ अ, दि.२७.९.२०१९.
८) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो/का- १/अपदे/पदे नि.मान्यता/२०२०-२१/११४४, दि. १६.३.२०२०
९) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि. १२.२.२०२०.

**शासन निर्णय:-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत जिल्हा कक्षातील ४४९ ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील ५०७४ अस्थायी पदे, केंद्र शासनाने निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या अनुषंगाने एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत ३३ जिल्हा कक्षातील २२१ नियमित अस्थायी पदे, पालघर जिल्ह्यांतर्गत जिल्हा परिषदेकरिता महिला व बाल विकास विभागाशी संबधित १० पदे आणि अतिरिक्त ठरत असलेली परंतु पुढे चालू ठेवणे आवश्यक असलेली १७३ अस्थायी पदे अशी एकूण ५४७८ अस्थायी पदे तसेच एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत कार्यरत असलेल्या ८१९४३ अंगणवाडी सेविका व ८१९४३ अंगणवाडी मदतनीस व १२४४४ मिनि अंगणवाडी सेविका यांची एकूण १७६३३० मानधनी पदाना (५४७८+१७६३३०=१८१८०८ अस्थायी/मानधनी पदे) दिनांक ०१/१०/२०१९ ते २९/०२/२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भाधीन क्रमांक-७ येथील दिनांक २७.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. त्यानुषंगाने आता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांनी एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत जिल्हा कक्षातील ४४९ ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील ५०७४ अस्थायी पदे, केंद्र शासनाने निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या अनुषंगाने एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत ३३ जिल्हा कक्षातील २२१ नियमित अस्थायी पदे, पालघर जिल्ह्यांतर्गत जिल्हा परिषदेकरिता महिला व बाल विकास विभागाशी संबधित १० पदे आणि अतिरिक्त ठरत असलेली परंतु पुढे चालू ठेवणे आवश्यक असलेली १७३ अस्थायी पदे अशी एकूण ५४७८ अस्थायी पदे तसेच एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत कार्यरत असलेल्या ८१९४३ अंगणवाडी सेविका व ८१९४३ अंगणवाडी मदतनीस व १३०११ मिनि अंगणवाडी सेविका यांची एकूण १७६८९७ मानधनी पदाना असे एकूण ५४७६+१७६८९७ = १८२३७३ या पदांना दि.०१.०३.२०२० ते ३१.८.२०२० पर्यंत पुढे चालु ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव दिनांक १६.३.२०२० च्या पत्रान्वये सादर केला आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक-९ येथील दिनांक १२.२.२०२० च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना, तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या, परंतु ज्याचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

४. सदरहू पदे सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत असे आयुक्त एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी संदर्भाधिन क्रमांक-८ येथील दिनांक १६.३.२०२० च्या पत्रान्वये प्रमाणित केले आहे. त्यानुसार वित्त विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयामधील तरतुदीनुसार, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांनी एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत जिल्हा कक्षातील ४४९ ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील ५०७४ अस्थायी पदे, केंद्र शासनाने निश्चित केलेल्या आकृतीबंधाच्या अनुषंगाने एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत ३३ जिल्हा कक्षातील २२१ नियमित अस्थायी पदे, पालघर जिल्ह्यांतर्गत जिल्हा परिषदेकरिता महिला व बाल विकास विभागाशी संबधित १० पदे आणि अतिरिक्त ठरत असलेली परंतु पुढे चालू ठेवणे आवश्यक असलेली १७३ अस्थायी पदे अशी एकूण ५४७८ अस्थायी पदे तसेच एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत कार्यरत असलेल्या ८१९४३ अंगणवाडी सेविका व ८१९४३ अंगणवाडी मदतनीस व १३०११ मिनि अंगणवाडी सेविका यांची एकूण १७६८९७ मानधनी पदाना असे एकूण ५४७६+१७६८९७ = १८२३७३ या पदांना दि.०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक १२.०२.२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळाद्वारे उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१७१३४००५५६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694,
serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.03.18 15:35:55 +05'30'

**( ला. रा. गुजर )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

१. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद(आयुक्तालय,नवी मुंबई मार्फत)
४. सर्व जिल्हा महिला बाल विकास अधिकारी(आयुक्तालय,नवी मुंबई मार्फत)
५. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत)
६. महालेखापाल,महाराष्ट्र राज्य १/२ (लेखा व अनुज्ञेयता) ( लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
७. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा,ठाणे
८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,(आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत)
११. वित्त विभाग (का-व्यय-१४/अर्थसंकल्प-१९/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय,मुंबई
१२. महिला व बाल विकास विभाग(का-४/का-६),मंत्रालय,मुंबई
१३. निवड नस्ती, का-७अ.